सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रुग्णालयातील दंतचिकित्सा विभागाचे बळकटीकरण अंतर्गत राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील ५ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय, क्रमांकः- अपदे-२०२५/प्र.क्र.६८/आरोग्य ३ (ई-फाईल क्रमांक:-१०२३०१७)
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक:- १२ मार्च, २०२५

वाचा:-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- अपदे-२०२४/प्र.क्र.६६/आरोग्य-३, दि.०१.१०.२०२४.
२) उपसंचालक, (मौखिक आरोग्य) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक:- जा.क्र. आसेआ/रामौआ/राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील ५ अस्थायी पदे/२५५४/२०२५, दि. २७.०२.२०२५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३.०३.२०२५.

शासन निर्णय:-

उपरोक्त अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रुग्णालयातील दंतचिकित्सा विभागाचे बळकटीकरण अंतर्गत राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील संचालक स्तरावर सुरु करण्यात आलेल्या स्वतंत्र मौखिक आरोग्य कक्षातील ५ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ या कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास देण्यात आलेली मुदतवाढ संपुष्टात आली आहे.

२. आता, या शासन निर्णयासोबत जोडलेल्या "परिशिष्ट-अ" मध्ये नमूद करण्यात आलेल्या राज्यस्तरीय प्रशासनासाठी संचालक स्तरावर सुरु करण्यात आलेल्या स्वतंत्र मौखिक आरोग्य कक्षातील ५ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च सन २०२५-२०२६ या वर्षाकरीता खालील नमूद लेखाशिर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १,**

"२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - ७ - पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना- राज्य योजना अंतर्गत योजना
(०६) (०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०२२६)"

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३.०३.२०२५ अन्वये दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थाई पदांच्या मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार, अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१२१५४०००६८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR, o, ou, email=sanjay.mahadeshwar@nic.in, c=IN
Date: 2025.03.12 17:31:43 +05'30'

**(सं.द. महाडेश्वर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १ / २ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (आस्थापना), मुंबई.
६. उप संचालक, मौखिक आरोग्य कार्यक्रम.
७. वित्त विभाग (कार्यासन- व्यय-१३/ अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
८. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प).
९. निवडनस्ती (आरोग्य ३).

**परिशिष्ट-अ**

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः- अपदे २०२५/प्र.क्र.६८/आरोग्य-३,
दिनांकः- १२ मार्च, २०२५ सोबतचे परिशिष्ट-अ)

| अ.क्र. | पदनाम | वेतनस्तर व वेतन मॅट्रिक्स | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | उपसंचालक (मौखिक आरोग्य कार्यक्रम) | एस-२५ (७८८००-२०९२००) | १ |
| २ | सहायक संचालक | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ३ | सांख्यिकी सहायक | एस-१३ (३५४००-११२४००) | १ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | एस-६ ( १९९००-६३२००) | १ |
| ५ | सहायक, गट-ड | एस-१ ( १५०००-४७६००) | १ |
| | **एकूण** | | **५** |